ब्राह्मण सेवा संघ, गोरेगाव. संचालित त्रैमासिक



# यज्ञ



।। वितरण फक्त सभासदांसाठी ।।

वर्ष ८ वे) आषाढ ते मार्गशीर्ष शके १९३९ (अंक २ व ३ रा)

संपादक - सतीश वि. रिसबूड अतिथि संपादक : विश्वास (अण्णा) जोशी

**अंतरंग**





**आद्य शंकराचार्य**

;k vadkr izdkf'kr >kysY;k ys[kkrhy erak'kh
czkã.k lsok la?k lger vlsyp vls ukgh-

भ्रमणध्वनि : 9869655847

Email: brahmansevasanghgoregaon@gmail.com

## संपादकीय

२०१५ साली महाराष्ट्रात भाजपाप्रणीत एनडीएला बहुमत मिळाले आणि ठरल्याप्रमाणे भाजपाचा मुख्यमंत्री निश्चित झाला. मा. देवेंद्र फडणवीस महाराष्ट्राचे मुख्यमंत्री झाले आणि पुन: एकदा अनेक वर्षांनी महाराष्ट्राच्या मुख्यमंत्रीपदावर एका ब्राह्मणाची वर्णी लागली त्यामुळे पुन: एकदा महाराष्ट्रातल्या खेड्यापाड्यात मराठा नेत्यांनी रुजविलेला ब्राह्मण द्वेष उफाळून आला. ह्या द्वेषाचा भडाग्नी गांधीवधानंतर काही काळ या महाराष्ट्रातल्या गावोगावी पेरला होता. गांधीच्या नावावर गावोगावी ब्राह्मणांची घरे पेटविली गेली. स्त्रियांवर अनंत अत्याचार झाले. सारा ब्राह्मण समाज खेड्यापाड्यांतून परागंदा होऊन शहराकडे धावला. शहरांमध्ये स्थायिक झाला. आजही महाराष्ट्रात अनेक गांवांमध्ये एखाद-दुसराच ब्राह्मण असल्याची परिस्थिती आहे.

इतके होऊनही ब्राह्मण समाजाने आपल्या बुद्धीच्या जोरावर आपले समाजातले आर्थिक-सामाजिक स्थान पुन: प्राप्त केले. उच्चशिक्षिण घेऊन डॉक्टर, वकील, इंजिनिअर होऊन स्वत:ची अर्थिक बाजू बळकट केली.

ब्राह्मणेत्तर समाजात मात्र या उलट गावोगावी ब्राह्मणाना लुटणाऱ्या टोळ्या निर्माण झाल्या. गावोगावच्या देशमुख पाटलांनी त्यांच्याच समाजातल्या तरुणांना हाताशी धरुन राजकीय सत्ता हस्तगत केली. हाती असलेल्या राजकीय सत्तेच्या जोरावर सार्वजनिक पैशांची लूट करुन स्वत:ची साम्राज्ये स्थापन केली. सर्वसामान्य ब्राह्मणेतर तरुण मात्र त्यांच्या हातातले बाहुले बनला. आणि या नेत्यांच्या तालावर नाचू लागला. नेत्याच्या नावाने त्याची दादागिरी/गुडंगिरी बिनादिक्कत चालू राहिली. त्यातून वैयक्तिक गटातटांचे राजकारण फुलत राहिले. नुकतीच झालेली साताराच्या दोन राजांमधली धुमश्चक्री हे त्याचेच उदाहरण. परंतु या नेत्यांनी समाजाच्या उन्नतीसाठी, शिक्षणासाठी क्वचितच प्रयत्न केले. आपली करोडोंची संपत्ती अब्जावधीत पोहोचली. हे स्थानिक नेते आपापल्या भागातले जणू राजेच होऊन बसले. स्थानिक तरूण मात्र उद्देशहीन, ध्येयहीन बनून भरकटत राहिला. असली, नसलेली बुद्धीही राजकीय नेत्याकडे गहाण टाकून बसला. परिणामी लहान-मोठ्या कारखान्यात, उद्योगात कमी-जास्त कौशल्याची कामे करण्यासाठी निर्माण झालेली पोकळी परप्रांतातील कष्टकऱ्यांनी भरुन काढली. आजही महाराष्ट्राच्या अनेक

गावांत लहान-मोठ्या नोकऱ्यात या परप्रांतीयांचा भरणा झालेला दिसतो. आणि स्थानिक तरुण मात्र आपल्या वडिलोपार्जित जमीन-जुमला विकून टगेगिरी करत गावात फिरताना दिसतात.

गांधीवधानंतरच्या दंगलीच्या खूणा विसरलेला ब्राह्मण समाज आर्थिक शैक्षणिक क्षेत्रात प्रगती करत राहिला. त्यामुळे हळूहळू काही प्रमाणात त्या ब्राह्मणेतर तरूणांना ही तफावत जाणवली. पण तोपर्यंत एक पिढी बरबाद झाली होती. जमीनजुमला विकून उदरनिर्वाह सुरु झाला. ब्राह्मण द्वेषाची नशा उतरु लागली. आणि नंतरची पिढी शिक्षणाकडे लक्ष देऊ लागली. परिणामी त्याला आपल्या आधीच्या पिढीच्या चुका लक्षात आल्या. नेत्यांनी केलेली समाजाची फसवणूक आणि लूट त्याच्या लक्षात आली आणि पेटून उठलेला हा युवक ब्राह्मणद्वेष विसरून एकत्र आला. आणि सत्तेचा वाटेकरी झाला. परिणामी गावोगावी जातीभेद विरहित नेतृत्व उदयाला आले.हा तरुण ब्राह्मणांच्या बुध्दिमत्तेचा आदर करु लागला. त्याने जागोजागी ब्राह्मणांचे राजकीय, बौद्धीक, आर्थिक नेतृत्वांचा स्वीकार केला. गांधीवधामुळे राजकीय परिघाच्या बाहेर फेकला गेलेला ब्राह्मण समाज पुनः आपल्या बुद्धीच्या जोरावर आपले स्थान निर्माण करु शकला. खरे तर आजच्या ब्राह्मण समाजाने आपली ही शक्तीस्थाने ओळखून त्याप्रमाणे आपली वैयक्तिक आणि सामाजिक प्रगती साधण्यासाठी एकत्र आले पाहिजे. ही आजची लोकशाही समाजरचनेतली काळाची गरज आहे.

**ब्राह्मण सेवा संघ, गोरेगांव तर्फे**

८-१३ वयोगटातील मुलांसाठी विविध उपक्रमाचे आयोजन करण्यात येणार आहे. तरी आपल्या कुटुंबियांपैकी / परिचितांपैकी कोणी ८ ते १३ वयोगटातील असल्यास कृपया कळवावे.

यापूर्वी क्ले मॉडेलींगचे वर्कशॉप झाले. त्यात मुलांना तीन वस्तू करायला शिकविल्या.

तसेच काही उपक्रम आपण घेवू इच्छित असल्यास स्वागत आहे.

संघाच्या फोन नंबरवर कृपया संपर्क करावा.

# ।। श्री राम समर्थ ।।

गुरुर्ब्रह्म गुरुर्विष्णू गुरुर्देवो महेश्वरः।
गुरुसाक्षात परब्रह्म तस्मै श्रीगुरवेनमः।।

देवाप्रमाणे वंदनीय व मार्गदर्शक गुरु लाभणे म्हणजे आपले परमभाग्य होय.

संस्कृत भाषेमध्ये गुरु या शब्दाचा अर्थ गु म्हणजे अंधार आणि अज्ञान दूर करणारा आणि रु म्हणजे निराकार अशा ह्या परब्रह्माचे सगुण रुपात दर्शन देणारा अंधकारमार्ग ज्ञानाने प्रकाशमय करुन शिष्याला प्रोत्साहन देणाऱ्या गुरुंना माझे विनम्र वंदन.....!!

गुरुचरणी ठेविता भाव । आपोआप भेटे देव।
म्हणूनी गुरुशी भजावे । रुप ध्यानासी आणावे।

देवाचे साक्षात रुप, ज्ञानदान करुन अज्ञानाचा एक एक पदर हळूवार बाजूला करणारा तो गुरु. गुरु एक परिवर्तन घडवून आणणारी शक्ती आहे. गुरुची कृपा असेल तेथे विजय निश्चीत आहे. ज्याप्रमाणे शिष्याचे प्रमाण असते. त्याप्रमाणे गुरुचे ही प्रमाण श्रीसमर्थ रामदास स्वामींनी अतिशय योग्य रीतीने समजावून सांगितले आहे. श्रीसमर्थ म्हणतात. गुरु, निर्मल आचारशील, अनुतापी म्हणजे झालेल्या चुकांनी पश्चाताप पावणारा विरक्त, सदाचारी, निष्टावंत आणि नेमस्त असावा. तसेच दक्ष, साक्षेपी व निर्गुण ब्रह्माची ओढ असणारा असावा. आपल्याला अनेक अज्ञानाच्या लांटाना निर्भयपणे पार पाडण्याचे बळ गुरु देतात. दुर्गुणांपासून सद्गुणांकडे, विनाशाकडून कल्याणाकडे अहंभावापासून विनम्रतेकडे गुरुच आपल्याला मार्गस्थ करतात. श्वासामध्ये गुरुंचा ध्यास जाणावा. डोक्यावर गुरुंचा आशीर्वाद असावा. गुरुचरणात स्वर्गीय आनंद मिळावा याकरिता आपल्या सदैव पाठिशी असणाऱ्या, प्रेरणा देणाऱ्या सर्व गुरुंना व प्रभूरामचंद्राचे व हनुमंताचे दास व भक्तवत्सल गुरुमाऊली श्रीसमर्थरामदास स्वामींना त्रिवार वंदन.

**।। जय जय रघुवीर समर्थ ।।**

**- दिप्ती दि. बेडेकर**

गोरेगाव (पू.)

# सोना कितना सोना है

चित्रपट गीतकारांनी आपल्या काव्यातून नेहमी प्रचलित जीवनातील दैनंदिन जीवनातील त्रुटी मांडलेल्या आढळतात. उदा. हिंदी चित्रपट प्यासा मधील जीन्हे नाज है हिंदपर वो कहां है ? हा प्रश्न शाहिर लुधियानवी यांनी समाजापुढे ठेवला होता. अशा तऱ्हेच्या समाज विरोधी प्रथा नेहमीच सिने गीतात आढळतात. कवी समीर यांनी हिरो नं.१ या चित्रपटात सोना कितना सोना है ही काव्य रचना केली आहे आपण वापरत असलेल्या दागिन्यातील सोन्यांचा दर्जा वास्तवात किती आहे हा प्रश्न मला नेहमींच सतावत असतो. माझ्या नशिबाने गेली ३५ वर्षे मला केंद्रिय सरकारच्या अधिपत्याखाली सोन्यावर प्रत्यक्ष काम / संशोधन करण्याची संधी लाभली. माझ्या सोन्याविषयीच्या अभ्यासात मला प्राप्त झालेली माहिती लोकांस सांगावी या उद्देशाने हा लेख लिहावासा वाटला.

आपली सृष्टी कोणी, कशी कशी निर्माण केली याचा विचार न करता त्याने काय काय निर्माण केले- हा एक अभ्यासाचा विषय आहे. पंचमहाभूतांनी एकत्रितपणे विचार पूर्वक इच्छित सर्व जीवसृष्टी निर्माण केल्यावर मनुष्य निर्माण केला. त्याने माणसाचा मेंदू नावाचा एक सुपर कॉम्प्युटर दिला. स्मित हास्य दिले, सौंदर्य दिले. या सर्वावर कडी करुन सर्व जगावर कर्तुमकर्तुम् सामर्थ्य गाजवणारा सुवर्ण वा सोनं नावाचा सम्राट दिला. सर्व जगात सोन हा एकमेव धातू आहे जो मुलतत्त्वी स्वरूपातच आढळतो. आतापर्यंत शोध लागलेल्या ११० च्या आसपास रासायनिक मूलतत्त्वी भौतिक धातू व अधातू मध्ये फक्त सौन्यालाच केवळ स्वत:चाच असा कधीही न विटणारा पिवळा धमक रंग लाभला आहे. याशिवाय त्यास काही विशेष असे गुणधर्म लाभले आहेत, ते असे १) शुद्ध सोने अतिशय मऊ असते २) एक ग्रॅम सोम्यापासून दोन किलोमीटर लांबीची व ५ मायक्रॉन जाडीची (आपल्या केसाच्या जाडी एवढी) तार खेचता येते. ३) सुमारे अठ्ठावीस ग्रॅम सोन्यापासून ठोकून ठोकून तीनशे चौरस फूट क्षेत्रफळाचा वर्ख बनविता येतो. ४) शुद्धसोने कोणत्याही एकाच खनिज आम्लात विरघळत नाही. नायट्रिक ॲसिड व हायड्रोक्लोरिक ॲसिड यांच्या प्रमाणित मिश्रणातंच पातळ सोन्याचा वर्ख काही प्रमाणात विरघळतो. शुद्ध सोन्याचे दागिने अतिशय मऊ असल्याने त्याचे दागिने वापरणे उचित होत नाही. दागिना सतत वापरण्या योग्य होण्यासाठी त्यास प्रमाणित कठीणपणा आणण्यासाठी सोन्यात अल्प प्रमाणात इतर धातू मिसळावे लागतात. पण मिसळलेल्या धातूचे प्रमाण किंचित जरी वाढले तरी आभूषणांचा रंग बदलतो. ५) कुठल्याही विद्युत प्रवाही वस्तूवर सोन्याचे पाणी दिल्यास त्या थराला सोन्याचे सर्व अंगभूत गुणधर्म लाभतात. ६) वातावरणातील कोणत्याही स्वरुपातील प्राणवायूमुळे सोन्यावर प्राणिलीकरण प्रक्रीया होत नसल्याने ती वस्तू अविनाशी होते. कोणत्याही भारतीय नागरिकाला (विशेषत: महिलांना) मग ती व्यक्ती श्रीमंत असो वा गरिब असो, त्यांची जीवनशैली शहरी असो वा ग्रामीण असो पण त्याची सोन्याची अभिलाषा "हव्यास" या वर्गातच समाविष्ट होते. तो आपले दागिने २२ ते २३ कॅरट अशा उच्च प्रतीच्या सोन्यातच घडवून घेतो. अनेकतामे एकता या गुणवैशिष्ट्याचा जणू भारतीय आदर्श दाखलाच! सोन्याची सर्वात जास्त खरेदी (वार्षिक खरेदी ७०० टनाहून अधिक) भारतात होते. या

पैकी ८०टक्के सोने केवळ दागिने घडवण्यासाठी आणि त्यास आवश्यकतो कठीणपणा वा झळाळी आणण्यासाठी अंश प्रमाणात दुसरे धातू मिसळावे लागतात. ही परधातूंची मिलावट जसजशी अधिक होते त्या प्रमाणात त्या दागिन्यांचा कॅरेट दर्जा कमी कमी होत जातो. १५ कॅरेट दर्जा पर्यंत त्या दागिन्याची लकाकी २२-२३कॅरेट दर्जाचीच दिसते. आपली श्रीमंती वा सामाजिक दर्जाचे प्रदर्शन करण्यासाठी बॅंकेतील लॉकर मधून आपले सर्व सोन्याचे दागिने काढून लग्नादी समारंभात अंगभर मिरवायचे आणि परत लॉकर मधे ठेवायचे. या व्यतिरिक्त या दागिन्यांचा ना स्वत:ला ना देशाला उपयोग. गंमत म्हणजे सर्वांनी आपले हे दागिने नेहमीच आपल्या विश्वासार्ह आणि पन्नास वर्षांच्या जुन्या पेढीतून घडवून घेतलेले असतात. हे दागिने आणल्यानंतर एकदातरी आपण ते दागिने तपासून घेतो का? त्या दागिन्यांची पावती सुद्धा संभाळूनठेवत नाही. पुढे काही वर्षानंतर काही कारणांसाठी वा त्यांचे नवीनिकरण करण्यासाठी वा विकण्यासाठी सोनारांकडे पुनर्मुल्यांकना साठी पोहोचतात. तेव्हां सोनार त्यांचे परीक्षण करण्याठी स्वत:जवळील अग्निजन्य खडकापासून बनविलेल्या लादीवर/गुळगुळीत गोट्यावर रेटून घासून रेघोट्या काढतो. मग त्यावर खनिज ॲसिड चे थेंब टाकतो व प्रक्रिया तपासतो. नंतर तो तुम्हाला तुमचे दागिने १७/१८कॅरेटचेच आहेत असे खात्रीपूर्वक सांगतो. ह्या परिक्षणातून तुम्हाला फक्त दागिन्यांची दर्शनी शुद्धता समजते. त्या दागिन्यांचे वितळवून परिक्षण केले तर त्यांची खरी शुद्धता समजेल. या दोनही निकालात हटकून तफावत आढळते.

सोन्याची शुद्धता - सुवर्णालंकार घडल्यानंतर त्या नगात सोन्याची टक्केवारी किती आहे हे समजण्यासाठी दोन पद्धतीचा वापर करतात. एकात सर्वसाधारणपणे कॅरेट या एककाचा उपयोग करतात तर दुसऱ्या मध्ये सोन्याची सूक्ष्मता वा ठोसपणा म्हणजेच वजनानुसार हजाराच्या हिस्सात (fineness) किती ते दर्शवले जाते. रिफायनरी मधून बाहेर पडणारे सोने कधीच शंभर नंबरी शुध्द नसते. आणि त्याच्या मृदूपणाचा व्यावहारिक म्हणजेच सुवर्णालंकार घडविण्यासाठी असलेला उपयोग शुन्य! रिफायनरीतून दोन प्रकारचे सोने बाहेर पडते. १) प्रुफ गोल्ड २) फाईन गोल्ड. आपणास स्टॅंडर्ड गोल्ड म्हणून जे विकले जाते त्यात ९९.९५टक्के शुद्द सोने असते. यालाच १०० टक्के शुद्ध सोने समजून त्यास २४ कॅरेटचे सोने गृहीत धरुन दागिने घडविले जातात. या मधेच इतर धातू मिसळून गिऱ्हाइकाच्या पसंतीनुसार नक्षीदार कलाकूसरीची आकर्षक आभूषणे तयार केली जातात. असे दागिने२२-२३कॅरेट चे आहेत अशी पावतीवर नोंदणी होते. अशी प्रत्येक गिऱ्हाइकाच्या पसंतीची आभूषणे फक्त भारतातलेच सोनार घडवून देतात. त्यामुळे त्यांनी त्यात कोणकोणत्या इतर धातूंची किती मिलावट केली आहे हे समजत नाही. एकदा गिऱ्हाइकास हा बनविलेला नग पसंत पडला कि मग काही दिवसांनी त्यावर अंतिम पॉलिश करण्यासाठी सोनार काही दिवसाची मुदत मागतो. दरम्यान पसंत केलेल्या दागिन्यावर विद्युत रासायनिक (इलेक्ट्रोप्लेटिंग) प्रक्रियेने शुद्ध सोन्याचे ५० मायक्रॉन (मलमल कापडाच्या जाडी इतका) शुद्ध सोन्याचा थर चढवितात. यामुळे सोन्याच्या थराखालील मूळ धातूचे पृथक्करण मिळत नाही. इतर देशात १४, १६, १८, २० कॅरेटचे मिश्र धातू लगडी वा तत्सम प्रमाणित स्वरुपात सरकारतर्फेच विकले जातात. तेथील व्यापारी हे विविध

स्वरुपातील प्रमाणित धातू विकत घेऊन यंत्राद्वारे त्या शेकडो डिझाईन्स च्या चेन्स खेचतात त्यांना पॉलिश करुन त्या सर्व चेन्स वर हॉल मार्किंगकरून घेतात. आपल्याकडे प्रत्येक सोनार स्वत:च दागिने घडवित असल्याने सत्य हॉल मार्किंग होणारच नाही. याचे कारण असे सोन्याचे परिक्षण करण्याच्या वर म्हटल्याप्रमाणे १) हानिकारक Destructive आणि २) अहानिकारक nondestructive अशा दोन पद्धती आहेत यातील मुखत्वे पद्धती या हानिकारक आहेत. म्हणजे-दागिन्यातील ५००मिलिग्रॅम भाग कापून त्याचे द्रावण करायचे मग त्याचे इलेक्ट्रॉनिक उपकरण वापरुन त्यातील सोन्याचे प्रमाण माहित करून घेणे. आपल्याकडे प्रत्येक दागिना हा वेगवेगळया मूळ धातू पासून बनविला जात असल्याने अंतीम हॉल मार्किंग कसे होते हा प्रश्न अनुत्तरीतच राहतो.

सध्या एकच अहानिकारक पद्धत उपलब्ध आहे. त्या उपकरणाचे नाव आहे एक्स रे फ्लुरोसन्स. पण त्यात अशी गोम आहे की त्यातील परिक्षण फक्त वरून खाली १५ ते २० मायक्रॉन खोलवर पर्यंतच होऊ शकते. त्या उपकरणाची किंमत एक करोड आहे, आणि त्याची संभाळ प्रक्रिया न परवडणारी आहे. कोणत्याही सोनाराला हे परवडेल काय. हा विषय अतिशय गहन आहे. आपले दागिने हॉल मार्किंग करून घ्या. असा हट्ट सरकार कोणत्या आधारावर करतो ? दुसरी गंमत म्हणजे सर्व बँका गोल्ड लोन देतात तेव्हा प्राप्त झालेल्या दागिन्यांचे मूल्यमापन ते कसं करतात.

अनेक देवालयात दागिने अर्पण केलेले असतात ते जेव्हा वितळवण्यासाठी एकत्र पाठविले जातात तेव्हा सोन्याच्या वजनात किलोवारी घट आलेली आढळते.

अती अती महत्वाचे - हिंदुस्थानातील सर्व देवालयाप्रमाणेच मुबंईतील प्रसिद्ध सिद्धीविनायक मंदिरात देवाला असंख्य दागिने अर्पण होतात. काही वर्षांपूर्वी या देवळावर सोन्याचा कळस चढविण्याचे ट्रस्टंनी ठरवले. ज्यांनी आपल्या प्रयोग शाळेत एक ग्रॅम सुद्धा सोन्यावर काम केलेले नव्हते असे सरकारी वैज्ञानिक सल्लागार नेमले गेले. ठाणे जिल्हातील डहाणू च्या आसपास मोठ मोठ्या गोल्ड प्लेटिंग साठी टाक्या वापरात आल्या. कळसावर २० ते २५ मायक्रॉन्स जाडीचा (शालेय विद्यार्थ्यांच्या वहीतील कागदाच्या जाडी इतपत) थर देण्यासाठी प्लेटिंग करणाऱ्या कंपनी कडे १० किलो २००ग्रॅम ५००ग्रॅम मिलिग्रॅम २४ कॅरेट चे सोने स्वाधीन केले. या सुवर्णकलशाची मंदिरावर स्थापना झाल्यावर दोन महिन्यातच तो कलश काळपट दिसु लागला व प्लेटिंगचे पापुद्रे निघू लागले. परिक्षणानंतर कळसावर चढवलेले सोने फक्त ४ते ५ मायक्रॉन जाडीचेच होते असे निष्कर्ष. एकूण गणित करता असे आढळले की दिलेल्या सोन्यापैकी फक्त १.१६१ किलो सोने चढवलेले आढळले. नंतर हे प्रकरण न्यायालयात गेले. पुढे त्याचे काय झाले माहित नाही.

अशी अनेक उदाहरणे. शेवटी यावरून आणखी एका चित्रपटात गीतातील ओळ समोर येते. चित्रपट-उपकार गाणे-कसमे वादे प्यार वफा सब बाते है बातों का क्या या गाण्यामधील भगवानको भी देते है धोका इनसां को क्या छोडेंगे ? कवी इंदिरवर यांचा अनुत्तरीत प्रश्न.

**- डॉ. गजानन गानू**

# वैद्य भिकाजी केशव पाध्येगुर्जर
# चरित्र आणि कर्तृत्व

कै. वैद्य भिकाजी केशव पाध्येगुर्जर हे राजापूर तालुक्यातील भू या गावीचे सुपुत्र! रत्नागिरी जिल्ह्यातल्या अनेक रत्नापैकी एक!

२० नोव्हेंबर १९३६ रोजी जन्मलेल्या या मुलाने प्रतिकूल परिस्थिततीतही ध्येय ठेऊन चिकाटीने अभ्यास केला. १९५४ मध्ये एस एस सी झाल्यानंतर राजापूरला कै. अण्णाशास्त्री पाध्ये या त्यांच्या चुलत्या जवळ राहून गुरुकुल पद्धतीने आयुर्वेदाचे अध्ययन केले. १९५७ मध्ये गोरेगाव येथे या मुबंईच्या उपनगरांत वैद्यकीय व्यवसाय सुरु केला. शीवमध्ये आयुर्वेद प्रवीण ही पदवी प्राप्त केली.

त्यांनी आयुर्वेद विषयावर विपुल लेखन केले.

देही आरोग्य नांदते या पुस्तकात त्यांनी या रुक्ष विषयांचे उत्कंण्ठावर्धक विवेचन केले आहे.

कायाकल्प या कादंबरीत वैद्यकीय व्यवसाय गैरमार्गाकडे का ?आणि कसा वळतो. याचे प्रतिकात्मक, विदारक चित्रण केले आहे. रुग्णाकडे बघण्याची दृष्टी, आपल्या पुत्राकडे जशी माया असते तशी असावी हे असं ठरवताच तत्प्रवृत्त वैद्याकडे कसे पाहावे त्याच्या बद्दल कोणती भावना बाळगावी याचा बोध सहज या कादंबरीतून होतो. कायाकल्पची ३री आवृत्ती प्रसिद्ध झाली. कायाकल्प या पुस्तकाचे हिंदी आणि इंग्रजीतही भाषांतर झाले आहे. त्यांच्या साहित्याला अनेक पारितोषिके मिळाली आहेत. २००३ मध्ये वैद्यराज दातार शास्त्री मेमोरिअल ॲवार्ड मिळाले होते.

ते आयुर्वेद विज्ञान मंडळाचे संस्थापक सदस्य होते. शीवच्या आयुर्विद्या प्रसारक मंडळाचे ते सहकार्यवाह होते. आयुर्वेद विज्ञान मंडळाच्या वार्षिक सर्वसाधारण सभेला संस्थेच्या स्थापनेपासून सतत ४३ वर्षे कोषाध्यक्षपद संभाळणाऱ्या, मंडळाचे प्रसार व प्रचार कार्यात मोलाचा सहभाग होता. २०१६ मध्ये त्यांचा राष्ट्रपतीच्या हस्ते सन्मान खाला. त्यांना आयुर्वेद महर्षी ही पदवी मिळाली.

संस्थेच्या आजवरच्या वाटचालीत वैद्य पाध्ये यांना असणाऱ्या मोलाचा सहभाग आमच्या सारख्याच पुढील कार्यकारीच्या सभासदांना मार्गदर्शक ठरणाऱ्या व आदर्श आस आहे. संस्थेचे सभासद व माजी कार्यवाह कै. वैद्य कृ के कानेटकर यांच्या बरोबरीने सतत क्रियाशील राहून वैद्य पाध्ये गुर्जर यांनी आयुवैद विज्ञान मंडळ संस्थेला उत्तम रितीने कार्य संस्था ५५ वर्षीही रितीने कार्य करीत आहे.

आयुर्वेद विज्ञान मंडळा तर्फे कै. वैद्य भि. के. पाध्येगुर्जर यांना भावपूर्ण आदरांजली वाहण्यात आली.

१ मार्च रोजी वृद्धापकाळाने ८१ व्या वर्षी पुणे येथे त्यांच्या निवासस्थानी त्यांची प्राणज्योत माळवली. त्यांच्या मागे २ सुपुत्र सुनबाई नातवंडे पत्नी दोन भगिनी असा सुविद्य परिवार आहे. त्यांच्या निधनाने प्रचंड असा चाहता वर्ग हळहळला आहे. स्वरुप असणारी ही विभूती आता स्वस्थ खाली आहे. ज्या रीतीने ते जीवन जगले त्या विचांरांच्या प्रसारासाठी आयुर्वेदाचे सद्‌वृत्त आचरण हीच या भू रत्नाला खरी श्रद्धांजली ठरावी!

वैद्य पाध्ये यांचे कार्य केवळ आमच्याच नव्हे तर संपूर्ण आयुर्वेद विश्वातील त्यांची कामगिरी बहुश्रुत आहे. तन मनाने झटणाऱ्या वैद्य पाध्ये यांचा सर्व सभासदांना सार्थ अभिमान आहे.

या प्रसंगी संस्थेतर्फे श्रध्दांजली वाहण्यात आली व शोक प्रस्ताव संमत करण्यात आला.

शोक प्रस्ताव - सर्व संस्थेचे सभासद व संस्था, सर्व कुटुंबियांचा दुःखात सहभागी आहे. त्यांच्या नावाने आपल्या सर्व कुटुंबियांचा सहकार्याने आयुर्वेदाचा जगताचा कायम स्मरणात राहिली आहे. योग व योगसंस्था स्थायी केंद्र आमच्या संस्थेत उभे रहावे हीच दिनजनी चरणी प्रार्थना.

- लेखिका - श्रीम. पाध्येगुर्जर

# माझे स्नेही डॉ. भि. के. पाध्ये गुर्जर यांना भावपूर्ण श्रद्धांजली

माझे परमस्नेही आणि संस्थेच्या सर्व सभासदांच्या मनाच्या कोपऱ्यात एक आदराचे स्थान असलेले डॉ. भि. के. पाध्ये गुर्जर यांचे आकस्मिक निधन झाल्याची कटु वार्ता कानी पडली आणि क्षणभर मन सुन्न झाले. अस काही घडेल असं ते आजारी असुनही कोणालाही वाटलं नव्हतं कारण आपल्या सोसायटीत इतकी ठणठणित आणि उत्साहाचा प्रचंड स्त्रोत असणारी एकमेव अशी कोण व्यक्ती असेल तर ती फक्त आमचे डॉक्टर आणि हे असं फक्त माझच नाही तर इतर सर्वांचच मत होत आणि हे अगदी १००टक्के पटणारं होतं. आपला तीन ठिकाणी असलेला वैद्यकीचा पेशा सांभाळूनही ते कधीही आळसावलेले दिसत नसतच पण इतर अनेक सार्वजनिक क्षेत्राशीही बांधिले होते. ते आपल्या वैद्यकीय पेशात निष्णात होते आणि त्यांचेकडे काही अशी औषधे होती की ती घेतल्याने १०० टक्के गुण आलाच पाहिजे. माझे जयप्रकाश नगर मधील देशमुख नावाच्या मित्राची पत्नी एका मोठ्या आजारातून बरी होऊनही अशक्तपणा, भूक न लागणे, निरुत्साह इत्यादी विकारामुळे त्रस्त होती त्यांना मी डॉक्टरांची भेट घेण्याचे सुचवले व त्यांनी ही तात्काळ ते अमलातही आणले आणि काय आश्चर्य तीला एक महिन्यातच फरक जाणवू लागला व आता ती ठणठणीत आहे.

डॉक्टराची माझी ओळख ते नर्मदा निवास येथे रहावयास आल्यापासुनची तेव्हा ते अविवाहीतच होते व सुरवातीला त्यांनी राहत्या घरीच व्यवसाय चालू केला होता. त्या काळी स्पिरीटची टंचाई होती व मी ते त्यांना नियमित पुरवित असे कारण माझ्याकडे दोन लायसन्स होती. तेव्हा आमची रोज भेट, गप्पा इत्यादी चालू असे आणि तेव्हापासूनची आमची मैत्री आतापर्यंत कायम होती.

आपण सध्या राहात असलेली नर्मदा निवास ही वास्तू कै. श्री भागवत यांचे मालकीची होती आणि सन १९६२/६३ ला ती बांधून पूर्ण झाली आणि तेव्हांपासून ते अगदी सन १९८८ साला पर्यंत आम्ही सर्व भाडे करु म्हणून होतो. आणि तेव्हापासून ते अगदी सन १९६७ पर्यंत सर्व काही सुरळीत चालू होते. मात्र कार पार्किंगच्या एफ एस आय वापरुन इमारतीवर तीसरा मजला बांधण्याचा निर्णय भागवतांनी घेतला तिसऱ्या मजल्यासाठी कर्ज (खर्च रु. ६०,०००/-) मग आणखी कर्ज असे करता करता शेवटी इमारत गहाण पडली एकूण रु. ५,०००००/- देणे निघाले. यावर उपाय म्हणून सर्व भाडेकरुनीच वर्गणी काढून इमारतच विकत घेण्याचे ठरले आणि ते अमलातही आले आणि अशा तऱ्हेने सर्व भाडेकरुंना पटवून सन १९८८-८९ रोजी

इमारतीचे रुपांतर को.ऑ.हा. सोसायटीत होऊन पुढे सर्व काही सुरळीत पणे सुरु झाले आणि अगदी तेव्हापासून ते सन २००९ पर्यत डॉक्टरच सोसायटीचे अध्यक्ष होते व मी सेक्रेटरी म्हणून काम पाहत होतो. अचानक अगदी क्षुल्लक कारणावरुन काही सभासदाचे मनात संशयाची पाल चुकचुकली व मग आरोप-प्रत्यारोप सुरु होऊन संस्था प्रशासकाचे ताब्यात जाण्याची वेळ आली व त्यानंतर झालेल्या वार्षिक सर्व साधारण सभेला उपनिबंधक हजर होते व त्यांनी शेवटी सर्व काही सुरळीत असल्याचे सर्टिफिकेट ही दिले होते. वास्तविक आम्ही पदाधिकारी असतानाचे काळातच श्री. भागवतांशी मैत्रीपूर्ण संबंधाचा उपयोग करुन संस्थेचे लिजहोल्ड फ्रिहोल्ड कनव्हेयन्स इत्यादी कठीण अशी कामे केली. मात्र काहीही घोळ वा अफरातफर नसतानाही वरील सर्व प्रकारामुळे आम्ही दोघेही व्यथित झालो. याकाळात केलेली मदत कधीही विसरता येणार नाही आणि त्यांनंतर सर्वांच्या मनातील संशयाचे निराकरण होऊन पुन्हा सर्व सुरळीत सुरु झाले आणि डॉक्टरांनीही निर्णय घेतला की शेवटी संस्था आपली असून सगळीकडेच असे प्रकार होत असतात तेव्हा नेने या पुढेही पद असो वा नसो आपण आपणास होईल तितके काम करीत राहू आणि आजपर्यंत ते चालू आहे. आणखी एक माहिती सांगणे आवश्यक आहे ती म्हणजे वर उल्लेख केल्या प्रमाणे भागवतांचे कर्ज फेडण्याचा मुद्दा पुढे आला तेव्हा काही व्यक्तींनी इमारत खरेदी करुन कर्ज फेडीचा प्रस्ताव ठेवला होता मात्र डॉक्टरांनीच तसे होऊ दिले नाही आणि जोशीनीही इमारत खरेदीची पहिली संधी आम्हा भाडेकरुनांच दिली.

डॉक्टरांची माझी दर दोन दिवसांनी भेट होत ती त्याचे घरी मग ते श्रीम. आऊंना सांगत असत की अरे नेनेना काही नाष्टा, चहा द्या आणि त्याही अगदी आनंदाने देत असत. डॉक्टरांचे दोन्ही पुत्र, सुना, पत्नि सर्व डॉक्टरांसारखीच सज्जन, सदा आनंदी व मोकळ्या मनाची त्यामुळे त्यांचे घरी जाण्यास कधी संकोच असा वाटत नव्हता. अस्तु !

आतां आमचे डॉक्टर आमच्यात नाहीत त्यामुळे त्यांची खासकरुन वा.स.सभा तसेच विशेष सर्व साधारण सभेचे वेळी गैरहजेरी सर्वांनाच चुटपुट लावणारी असेल याचे मुख्य कारण त्यांचा आदर वाटावा असे व्यक्तिमत्व होतेच मात्र एखादा नविन ठराव त्याचा फायदा तोटा यासह सभेपुढे मांडून तो सर्वांना पटवून देऊन पास करुन घेणे यात हातखंडा होता याच उदाहरण म्हणजे सन २००२ पासून चालू केलेला रिपेअर फंड की ज्याच्यातून दुरुस्तीची अनेक कामे करुन घेता येतात. आता

सहकारी गुहनिर्माण संस्था म्हणजे येथे राहणारे सभासद हे मालकच असतात आणि म्हणून प्रत्येकाला त्याचे म्हणणे, सूचना सभेपुढे मांडण्याचा पूर्ण हक्क असतो आणि दरम्यान वादविवाद कटुता हे आलेच व तसे झालेही आहे मात्र त्यावेळी डॉक्टर हस्तक्षेप करून प्रकरण तेथेच संपवित असत आणि सर्व सभासदही सभा संपली की जणू काही घडलेच नाही असे समझुन पुन्हा एक होत असत. खरचं हा दुर्मिळ असाच गुण आहे तो तसाच चालूही आहे.

डॉक्टरांचे एक स्वप्न अधुरेच राहीले ते म्हणजे इमारतीचे रिडेव्हलपमेंट करुन एक सर्व सुखसोचींनी परिपूर्ण अशी वास्तू उभी करणे आणि याची सर्व प्रक्रिया पूर्ण होऊन विकासकाची निवडही झाली होती मात्र कोठेतरी माशी शिंकली आणि पुढिल प्रक्रिया स्थगित झाली आहे आम्ही निराश न होता याला पुन्हा जोमाने सुरुवात करुन ती पूर्णत्वास नेणारच आता यश येणे न येणे हे शेवटी नशिबावर नसून आपल्या कर्मावरच अवलंबून असते कारण भगवान श्रीकृष्णानेच वचन आहे की निरपेक्ष कर्म करित रहा यश येणे न येणे हे तुमच्या कर्मावर अवलंबून असते. थोडक्यात सावधानता बाळगा. डॉक्टरांचे विषयी खुप काही सांगण्यासारख्या गोष्टी आहेत मात्र आता फापट पसारा न लावता येथेच संपवितो. संस्थेची नुकतीच अधिकृत अशी कार्यकारणी अस्तित्वात आली असून त्यात श्री अतुल जोगळेकर सारखे उच्च विद्याविभुषित सभासद आहेतच आणि विशेष म्हणजे आपले श्री. गुणप्रज्ञ पालेकरही आपला अमूल्य वेळ खर्च करुन संस्थेची दैनंदिन कामे पूर्ण करण्यासाठी मदत करीत आहेत.

डॉक्टरांचे दोन्ही पुत्र आणि स्नुषा ही सुद्धा उच्च विद्याविभुषित तर आहेतच पण तितकिच निगर्वि समजूतदार असून श्रीम. आऊही डॉक्टरांसारख्याच निगर्वि, प्रेमळ व समजुतदार असून या अनपेक्षित अशा उद्भवलेल्या दुखा:तून सावरतील यात शंका नाही. अस्तु !

जोमाने सुरुवात करु या हीच त्यांना खरी श्रद्धांजली ठरेल.

आपला विश्वासू

**- द. बा. नेने**